**केंद्र पुरस्कृत "मिशन शक्ती" अंतर्गत "सामर्थ्य" या उपयोजनेतंर्गत महिला सक्षमीकरण केंद्र (Hub for Empowerment of Women) ही घटक योजना राबविण्यास मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
शासन निर्णय क्रमांक- मसकें २०२२/प्र.क्र.३०८/कार्या-२,
नवीन प्रशासकीय इमारत, तिसरा मजला, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: - ०६ ऑगस्ट, २०२४.

**संदर्भ:-**१) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र. मसकें २०२२/प्र.क्र.३०८/कार्या-२, दि.२६.०७.२०२३.
२) उप सचिव, महिला व बाल विकास मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. NHEW/४१/२०२३-NHEW (१०९७९०), दि.११.१२.२०२३.
३) मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.१४.०६.२०२४ रोजी झालेल्या उच्च स्तरीय सचिव समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाने "सामार्थ्य" या उपयोजनेच्या महिला सक्षमीकरण केंद्राच्या मार्गदर्शक सूचना सुधारित केल्या आहेत. त्यामध्ये राज्य/ केंद्रशासीत प्रदेशांचे विभाजन करुन राज्ये/केंद्रशासित प्रदेशांमध्ये लोकसंख्येचा आकार, घनता आणि गटाची (Blocks) सरासरी संख्या यासारख्या विविध घटकांचा विचार करून नवीन तरतुदींचा समावेश करण्यात आला आहे. सदर तरतुदीनुसार तीन श्रेणींमध्ये (मोठे, मध्यम आणि लहान) संसाधनांचे समान वाटप सुनिश्चित करण्यासाठी आणि देशातील विविध क्षेत्रांच्या विविध गरजा पूर्ण करण्यासाठी त्यांच्या आर्थिक निकषांसह आणि राज्ये/केंद्रशासित प्रदेशांच्या श्रेणींसह सादर केलेली सुधारित मार्गदर्शक सूचना संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये निर्गमित करण्यात आल्या आहेत.

सदर सुधारित मार्गदर्शक सुचनेनुसार केंद्र पुरस्कृत "मिशन शक्ती" या एकछत्री योजनेंतर्गत "सामार्थ्य" या उपयोजनेच्या "महिला सक्षमीकरण केंद्र" या घटक योजनेंतर्गत "महिला सक्षमीकरण केंद्रामार्फत लिंग संवेदना, हुंडाबळी घटनांस प्रतिबंध, कौटुंबिक हिंसाचारास प्रतिबंध इ. बाबत शाळा, महाविद्यालये, शासकीय कर्मचारी, सामान्य जनता इ. मध्ये समुपदेशन, परिसंवाद, शिबिरे, जनजागृती कार्यक्रम, मोहिमा, उपक्रम राबविणे" तसेच त्यांच्या अंमलबजावणीसाठी राज्य आणि जिल्हास्तरावर "भाडेतत्वावर वाहन सुविधा" उपलब्ध करुन घेण्यास तसेच निधीची तरतूद करण्यास संदर्भ क्र.३ येथील बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. त्यास अनुसरुन घटक योजनेंतर्गत "उपक्रम" व "भाडेतत्वावर वाहन सुविधा" घटक समाविष्ट करुन त्यासाठी निधीची तरतूद करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

केंद्र शासनाने संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये महिला सक्षमीकरण केंद्राच्या मार्गदर्शक सूचनामध्ये सुधारणा केल्यानुसार "महिला सक्षमीकरण केंद्र" या घटक योजनेच्या संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयामध्ये **अ.क्र.३ येथे नमूद "महिला सक्षमीकरण केंद्राचे कार्ये" यामध्ये अ.क्र. ब) नंतर खालीलप्रमाणे सदर केंद्राचे कार्ये समाविष्ट करुन त्यासाठीच्या आर्थिक तरतूदीस मान्यता देण्यात येत आहे:-**

**क)** महिला सक्षमीकरण केंद्रातंर्गत लिंग संवेदना, हुंडाबळी घटनांस प्रतिबंध, कौटुंबिक हिंसाचारास प्रतिबंध इ. बाबत शाळा, महाविद्यालये, सरकारी नोकर, सामान्य जनता इ. मध्ये समुपदेशन, परिसंवाद, शिबिरे, जनजागृती कार्यक्रम, मोहिमा, उपक्रम राबविण्यात यावे.

**ड)** महिला सक्षमीकरण केंद्राद्वारे उपक्रम आणि जनजागृती मोहिमांच्या सुरळीत आणि योग्य अंमलबजावणीसाठी राज्य आणि जिल्हा स्तरावर "भाडेतत्वावर वाहन सुविधा" उपलब्ध करुन देण्यात यावी.

२. संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयामधील **अ.क्र.८ येथे नमूद "अनुदान" बाबींसाठी दर्शविण्यात आलेल्या तरतूदीचा तक्ता वगळून त्याऐवजी नव्याने "उपक्रम" व "भाडेतत्वावर वाहन सुविधा" या घटकांच्या समावेश करुन नवीन तरतूदीचा तक्ता समाविष्ट करण्यात येत आहे:-**

**State Hub for Empowerment of Women (One):- Per Annum**

| Sr.No. | Head | Centre (Rs.) |
|---|---|---|
| 1 | PMU @ State Level (8 persons) | 28,20,000/- |
| 2 | Administrtative Cost @ 1 Lakh pm | 12,00,000/- |
| 3 | Vocational Activities/ Training at State Level/ District Level | 12,00,000/- |
| 4 | Non-recurring every five year (Computer Peripherals, Telephone, Fax, Internet, Furnishing for he ward & other rooms, CCTV Camera & its installation etc.) | 7,00,000/- |
| 5 | Provision of Vehicle/POL@ Rs.4,50,000 Per vehicle per State | 4,50,000/- |
| 6 | Allocation of Funds for outreach activites at State | 21,60,000/- |
| **Total** | | **85,30,000/-** |

**District Hub for Empowerment of Women (Total 36 Centres in the state):- Per Annum**

| Sr.No. | Head | Per Centre (Rs.) | For 36 Centres (Rs.) |
|---|---|---|---|
| 1 | Management Cost (8 Persons) | 20,40,000/- | 7,34,40,000/- |
| 2 | Administrative Cost at District Level @25000 pm | 3,00,000/- | 1,08,00,000/- |
| 3 | Non-recurring every five year (Computer Peripherals, Telephone etc) | 7,00,000/- | 2,52,00,000/- |
| 4 | Provision of Vehicle/POL @ Rs.4,50,000 Per vehicle per State | 4,50,000/- | 1,62,00,000/- |
| 5 | Allocation of Funds for outreach activites at State | 5,40,000/- | 1,94,40,000/- |
| **Total** | | **34,90,000/-** | **12,56,44,000/-** |

जिल्हा महिला सक्षमीकरण केंद्रासाठी रु.६,००,०००/- इतकी तरतूद असून, त्यापैकी राज्यस्तरीय उपक्रमांसाठी १०% व उर्वरित ९०% निधी जिल्हास्तरीय उपक्रमांसाठी जिल्हा स्तरावर ठेवण्यात आला आहे. तथापि, कामगिरी, गुणवत्ता आणि स्थानिक गरज या निकषांच्या आधारावर कोणत्याही जिल्ह्याला वाटप केलेल्या निधीपैकी १०% निधी आवश्यक असलेल्या जिल्ह्यासाठी शासनाच्या मान्यतेने वर्ग करुन वापरता येईल.

३. संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयामधील अ.क्र.१० येथे नमूद "निधी वितरणाची पध्दत" च्या परिच्छेद क्र.१ मधील "वन स्टॉप सेंटर" याऐवजी "महिला सक्षमीकरण केंद्र" तसेच परिच्छेद क्र.२ येथील "संबल" याऐवजी "सामार्थ्य" अशी सुधारणा करण्यात येत आहे.

४. संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयातील इतर तरतूदी कायम राहतील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०८०६१०४३५७१२३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASAD VINAYAKRAO KULKARNI

Digitally signed by PRASAD VINAYAKRAO KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=83b8be9eb843dd6eccbd6aa4f9eecd0b5f7aca67ff32b2eef7b9ed2d85ab9442, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7D19730DDF785210D50C28934B75E9B7B4F5D06B6181CF1901CE3E48EC9E3985, cn=PRASAD VINAYAKRAO KULKARNI
Date: 2024.08.08 10:42:36 +05'30'

**(प्र.वि. कुलकर्णी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.मंत्री, महिला व बाल विकास यांची खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष/ सदस्य, विधानसभा/ विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई,
६. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव,मंत्रालय,मुंबई,
७. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०.आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे,
११.महालेखापाल, २/१ (लेखा व अनुज्ञेयता) / लेखापरीक्षा (मुंबई/नागपूर),
१२.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई शहर / मुंबई उपनगर,
१३.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र,
१४.सर्व उपसचिव, सर्व अवर सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,

१५.उपायुक्त (महिला विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे,
१६.सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,
१७.अवर सचिव (का.४/अर्थसंकल्प), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८. सर्व कार्यासने, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९.निवडनस्ती, का-०२.